नागपूर सुधार प्रन्यासच्या प्रिसिंक्ट अभिन्यासातील सार्वजनिक उपयोगाचे भूखंड क्रमांक ६ व ७ वर मा. खासदारांच्या निधीतून बांधण्यात आलेले समाजभवन तेली समाज सभा या संस्थेला हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नासुप्र-२०१४/प्र.क्र.१८३/न.वि.२६**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १२ मार्च २०१५**

**वाचा -**

१) शासन पत्र क्रमांकः नासुप्र-२२०८/प्र.क्र.४७/न.वि.२६ दिनांक ०२.०३.२००९
२) शासन पत्र क्रमांकः नासुप्र-२२०८/प्र.क्र.४७/न.वि.२६ दिनांक १८.०२.२०१०
३) सभापती नागूपर सुधार प्रन्यास नागपूर यांचे पत्र क्रमांकः प्रशा.वि/४७०३, दि. ०८.०९.२०१४

**प्रस्तावना -**

संदर्भाधीन शासन पत्र क्रमांक : नासुप्र-२२०८/प्र.क्र.४७/न.वि.२६, दिनांक ०२.०३.२००९ व दिनांक १८.०२.२०१० अन्वये नागपूर सुधार प्रन्यासाच्या प्रिसिंक्ट अभिन्यासातील सार्वजनिक उपयोगाचे भूखंड क्रमांक ६ व ७ बाबत सभापती नागपूर सुधार प्रन्यास यांना कळविण्यात आलेले शासनाचे निदेश, त्याचप्रमाणे सभापती नागपूर सुधार प्रन्यास यांनी संदर्भाधीन पत्र दिनांक ०८.०९.२०१४ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव या अनुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे

**शासन निर्णय:-**

मौजा नागपूर येथील खसरा क्रमांक : ५१७, ५१८ नागपूर येथील सार्वजनिक उपयोगाचा भूखंड क्रमांक ६ व ७ (भूखंड क्रमांक ६ चे विभाजित भूखंड क्रमांक : ६ व ७) वर मा. खासदाराच्या निधीतून समाजमंदिराचे बांधकाम पुर्ण करण्यात आलेले आहे. सभापती नागपूर सुधार प्रन्यास यांनी संदर्भाधीन दिनांक ०८.०९.२०१४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, सदर समाज मंदिराचा वापर तेली समाजास पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून ३० वर्षाकरीता देखभाल/ दुरुस्ती व्यवस्थापनाकरीता देण्यास नागपूर सुधार प्रन्यास जमीन विनियोग नियम १९८३ च्या नियम २६ नुसार नियम शिथिल करण्याबाबत शासनास अधिकारात नियम ५ (२) मधील जाहिर आदेश मागविण्याची अट शिथिल करुन देण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

१) सदर भूखंड व समाजमंदिराची मालकी NIT यांची राहिल. (This is also necessary because the ownership of assets created under MPLADS cannot be passed on to any private Institution)
२) सदर समाजमंदिराच्या संदर्भात “वापर, देखभाल/ दुरुस्ती व व्यवस्थापना” चा करार ३० वर्षानंतर दोन्ही पक्ष renew करु शकतील.

३) सदर समाजमंदिराच्या वापरातून तेली समाज संस्थेस प्राप्त होणा-या उत्पन्नाच्या विनियोगाबाबत नागपूर सुधार प्रन्यासाने निर्णय घ्यावा. त्या अनुषंगाने नागपूर सुधार प्रन्यास व संबंधित संस्था यांच्यामध्ये होणा-या करारानुसार आकारणीबाबत निर्णय घेण्यात यावा.

४) उत्पन्नाच्या हिश्श्याबाबत नागपूर सुधार प्रन्यास व तेली समाज सेवा यांनी परस्पर सामजस्याने नोंदणीकृत करार करावा.

५) उपरोक्त भूखंडाबाबत / व्यवहाराबाबत भविष्यात काही न्यायालयीन वाद उद्भवल्यास त्याबाबत शासन जबाबदार राहणार नाही.

६) उपरोक्त भूखंडाच्या अनुषंगाने शासनाचा देय महसूल संबंधित वापर करणा-या संस्थेने वेळोवेळी अदा करावा.

७) बांधण्यात आलेल्या समाजभवनावर तेली समाज संस्थेची मालकी राहणार नाही व समाजमंदिराच्या नामकरणाबाबत नागपूर सुधार प्रन्यास व नागपूर महानगरपालिका यांच्या प्रचलित नियमानुसार उचित निर्णय घेण्यात यावा.

८) समाजभवन सर्वसामान्य जनतेस ना नफा - ना तोटा तत्वावर खुले ठेवण्याची जबाबदारी नासुप्रची राहील.

९) समाज भवनचे काम खासदार, स्थानिक क्षेत्र विकास कार्यक्रमाच्या निधीतून झालेले असल्यामुळे सदर योजनेतील तत्वे, अटी व शर्ती यांचे पालन करण्याची जबाबदारी नासुप्रची राहील"

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३१३१७२३३००६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Jayasingrao Nanasaheb Patil

Digitally signed by Jayasingrao Nanasaheb Patil
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao Nanasaheb Patil
Date: 2015.03.13 17:33:11 +05'30'

**(ज.ना.पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
४. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
५. आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, नागपूर
७. निवड नस्ती न.वि.२६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२